**शैक्षणिक वर्ष २०११-२०१२ पासून शासकीय, अशासकीय अनुदानित व कायम विनानुदानित एम.एड. महाविद्यालयातील केंद्रीभूत प्रवेश पद्धतीने प्रवेशासाठी सामायिक प्रवेश परीक्षा ( CET) लागू करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांक : एम.एड. २०११ / प्र. क्र. २१ / मशि - २,**
**मंत्रालय ( विस्तार ), मुंबई - ४०० ०३२.**

दिनांक : २३ मार्च, २०११.

वाचा : १. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक : एम.एड. २०११ / प्र. क्र. २१ / मशि - २, दिनांक ९ मार्च, २०११.

**शासन शुद्धीपत्रक :**

शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून शासकीय व अशासकीय अनुदानित व कायम विना अनुदानित एम.एड. महाविद्यालयातील केंद्रीभूत पद्धतीने प्रवेशासाठी सामाईक प्रवेश परीक्षा (सी.ई.टी.) लागू करण्याबाबत निर्गमित करण्यात आलेल्या दिनांक ९ मार्च, २०११ रोजीच्या शासन निर्णयातील पाचव्या ओळीतील -

**"शासकीय महाविद्यालयांना CET माध्यमातून प्रवेश पद्धती अनिवार्य राहील. तर जी महाविद्यालये शासकीय सामाईक प्रवेश प्रक्रियेत सहभागी होणार नाहीत त्यांना महाराष्ट्र विना अनुदान संस्थाचालक असोसिएशन यांनी घेतलेल्या सामाईक प्रवेश प्रक्रियेत समाविष्ट व्हावे लागेल. "**

या वाक्यांऐवजी

**" शासनाची सीईटी व केंद्रीय प्रवेश प्रक्रीया, शासकीय अध्यापक महाविद्यालयांबरोबरच अशासकीय अनुदानित अध्यापक महाविद्यालयांना अनिवार्य राहील. जी अशासकीय विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालये शासकीय प्रवेश प्रक्रीयेत सहभागी होणार नाहीत, त्यांना महाराष्ट्र विना अनुदान संस्थाचालक असोसिएशन यांनी घेतलेल्या सामाईक प्रवेश प्रक्रियेत समाविष्ट व्हावे लागेल. "**

असे वाचावे.

तसेच परिच्छेद क्रमांक १ नंतर खालील परिच्छेद अंतर्भुत करण्यात येत आहे.

**" विद्यापीठाच्या शिक्षण विभागांतर्गत विद्यापीठ स्तरावर राबविण्यात येणाऱ्या एम.एड. अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी विद्यापीठाने त्यांच्या स्तरावर जाहिरातीद्वारे शासकीय सीईटी उत्तीर्ण**

**उमेदवारांचे अर्ज मागवावेत व प्राप्त अर्जातून गुणवत्तेनुसार व शासनाने प्रसिद्ध केलेल्या नियमावली अनुसार विद्यापीठ स्तरावर प्रवेश प्रक्रीया राबवावी. "**

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक क्रमांक २०११०३२३१७३८४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( महेश पाठक )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
अध्यक्ष, प्रवेश नियंत्रण समिती, शासकीय तंत्र निकेतन, ३ रा मजला, खो.क्र. ३०५, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग, वांद्रे ( पूर्व ), मुंबई ४०० ०५१,
संचालक, पश्चिम क्षेत्रिय कार्यालय, एन. सी. टी. ई., भोपाळ,
कुलगुरु, सर्व विद्यापीठे,
कुलसचिव, सर्व विद्यापीठे,
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
सर्व जिल्हाधिकारी,
प्राचार्य, सर्व एम.एड. महाविद्यालये ( संचालक, उच्च शिक्षण यांचेमार्फत ),
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर,
महालेखापाल ( लेखापरीक्षा ), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
वित्त विभाग / सामान्य प्रशासन विभाग,
संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व सह / उपसचिव, अवर सचिव व कार्यासन अधिकारी,
निवड नस्ती.